**सार्वजनिक बांधकाम विभागातील इमारतीची स्थापत्य विषयक कामे करतांना अनुसरावयाची पध्दती दुरुस्ती व देखभालीची कामे हाती घेताना उपभोक्ता विभागाशी विचारविनिमय करुन उपभोक्ता विभागाच्या आवश्यकतेप्रमाणे कामे करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी-०३/२०१५/प्र.क्र. ६०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३०/६/२०१५

**संदर्भ** :- (१) शासन परिपत्रक क्र. BPL-१२८८/सीआर-४८८/इमारती-१ दिनांक १२/१२/८८
(२) शासन परिपत्रक क्र.BPL-१२९०/सीआर-५९५/इमारती-१ दिनांक १०/४/१९९०
(३) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. बीडीजी-१०८८/सीआर-१४०/इमारती-२ दिनांक १९/३/९१
(४) शासन परिपत्रक क्र.BPL-१०००/प्र.क्र.४३/इमारती-१ दिनांक २९/५/२०००
(५)शासन पत्र क्र. BPL-२००३/सीआर-१९१/इमा-१ दिनांक १६/७/२००३
(६) इमारतींच्या दुरुस्ती व देखभालीच्या संदर्भात दिनांक २०/४/१९९१ रोजी सा.बां.विभागाने प्रसिध्द केलेली नियम पुस्तिका.

**प्रस्तावना :**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत शासनाच्या सर्व विभागांच्या इमारतींची दुरुस्ती व देखभाल करण्यात येते. याअंतर्गत इमारतींची वेळावेळी पाहणी करुन तसेच उपभोक्ता विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांशी विचारविनिमय करुन त्यांच्या सूचनांप्रमाणे व आवश्यकतेनुसार कामे हाती घेऊन विहित नियमानुसार पूर्ण करण्यात येतात. सार्वजनिक बांधकाम विभागाने दिनांक १०/४/१९९० रोजीच्या शासन निर्णयाद्वारे सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्याप्रमाणे सर्व क्षेत्रिय अधिका-यांमार्फत इमारतींच्या देखभाली व दुरुस्तीसंदर्भात कार्यवाही होणे आवश्यक आहे. शासनाने निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन क्षेत्रिय स्तरावरील अधिकारी करीत नसल्याची बाब विविध विभागांनी व लोकप्रतिनिधींनी शासनाच्या निदर्शनास आणली आहे. यामध्ये प्रामुख्याने उपभोक्ता विभागाशी विचारविनिमय न करता त्यांना अनावश्यक वाटणारी कामे हाती घेऊन पूर्ण करण्यात येत असल्याची बाब निदर्शनास आली आहे.

२. जनहित याचिका क्र.२८/२०१० च्या अनुषंगाने न्यायालयाने शासनाने काही बाबी स्पष्ट करावयाच्या सूचना दिलेल्या आहेत. याच अनुषंगाने नागपूर कंत्राटदार असोसिएशन यांनी शासनस्तरावर काही सुधारणा करण्याबाबत न्यायालयास सुचविले आहे. यासंदर्भात रिट याचिका क्र. २८/२०१० संदर्भात न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे शासनाच्या दिनांक २/१२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे अभ्यासगटाची नियुक्ती केली आहे. या अभ्यासगटाचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. या समितीने केलेल्या शिफारशीसंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसोबत दिनांक १२/३/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या शिफारशींवर सविस्तर विचारविनिमय करण्यात आला. बैठकीस उपस्थित सर्व मुख्य अभियंतांनी त्यांचे अभिप्राय बैठकीमध्ये नमूद केले. या बैठकीमध्ये सर्वानुमते समितीने केलेल्या शिफारशींमधील काही महत्त्वाच्या बाबींबाबत न्यायालयाच्या निर्देशांप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने

सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीत काही सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय** :

इमारतींच्या दुरुस्तींची व देखभालीची कामे करताना शासनाने यासंदर्भात निर्गमित केलेल्या दिनांक १०/४/१९९० रोजीच्या शासन निर्णयातील तसेच तद्नंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांनुसार क्षेत्रिय अधिका-यांनी कार्यवाही करावी. या सूचंनाप्रमाणे कामे करताना आवश्यक अभिलेख जतन करुन ठेवावेत.

शासन सार्वजनिक बांधकाम विभागाने सन १९९१ मध्ये इमारती दुरुस्तीबाबत मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. या मार्गदर्शक तत्वानुसार दुरुस्ती व देखभालीची मानके (Norms) तसेच दुरुस्ती प्रकार (Type of repair) याचा सखोल अभ्यास करुन इमारत दुरुस्तीची अंदाजपत्रके तयार करावीत.

इमारतीची चालू दुरुस्ती, विशेष दुरुस्ती, विविक्षित दुरुस्तीची कामे याबाबत कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता यांनी उपभोक्त्या खात्याच्या जिल्हा प्रमुखांच्या समवेत बैठक घेवून तथा प्रत्यक्षात कामांची पहाणी करुन कामाची निश्चिती करावी. त्यावर कार्यकारी अभियंता तथा उपभोक्ता विभागाचे जिल्हा प्रमुख संयुक्तरित्या स्वाक्षरी करावी. तदनंतर कार्यकारी अभियंता हे सदर कामांचे अंदाजपत्रके व नकाशे तयार करतील. त्यानुसार कार्यकारी अभियंता हा दुरुस्ती कार्यक्रम मंजुरीसाठी अधिक्षक अभियंता यांच्याकडे सादर करतील. अधिक्षक अभियंता सदर दुरुस्ती कार्यक्रमातील चालू दुरुस्ती आणि विशेष दुरुस्तीच्या कामांची नमुना तपासणी करुन त्यास उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत आणि विहित निकषांच्या अधीन राहून मंजूरी देतील आणि विविक्षीत दुरुस्ती स्वरुपाचा कार्यक्रम मंजूरीसाठी मुख्य अभियंता यांचेकडे सादर करतील. मुख्य अभियंता हे विविक्षीत दुरुस्ती कार्यक्रमास उपलब्ध निधी मर्यादेत व विहित निकषांच्या अधीन राहून मंजूरी देतील.

सदरहू कार्यक्रम मंजूर करताना संबंधित उपभोक्त्या विभागाचे मागील वर्षाचे उपलब्ध निधी, इमारतीचे बांधकाम क्षेत्रफळ, इमारतीचे हेरीटेज व नॉनहेरीटेज, इमारतीचे महत्व इ.बाबीचा विचार करुन अधिक्षक अभियंता/मुख्य अभियंता दुरुस्ती कार्यक्रमास मंजूरी देतील.

इमारतींच्या दुरुस्ती व देखभालीच्या कामांसंदर्भात शासनाने निर्गमित केलेल्या सूचनांप्रमाणे क्षेत्रिय अधिका-यामार्फत कार्यवाही करण्यात येत नसल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिका-याविरुध्द योग्य ती दंडनीय कारवाई करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१३१५०३९२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar Dinkar Sardeshmukh

Digitally signed by Vidyadhar Dinkar Sardeshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Dinkar Sardeshmukh
Date: 2015.08.04 13:17:53 +05'30'

**( वि.दि.सरदेशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग

२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
३. सर्व अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ
४. सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मुंबई
७. निवडनस्ती, इमारती-२ सा.बां.वि. मंत्रालय.